अटल भूजल योजनेंतर्गत उत्कृष्ट लोकसहभाग नोंदविणाऱ्या व काम करणाऱ्या गावांना पुरस्काराने सन्मानित करणेकरिता भूजल समृध्द ग्राम स्पर्धेचे आयोजन करणेबाबत

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक:-भूजल-१८२२/प्र.क्र.२४५/पापु-१५
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक- ०९ मार्च, २०२३

वाचा:-

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक: भूजल-१८२०/ प्र.क्र.३४/ पापु-१५ दिनांक २६ नोव्हेंबर, २०२०.
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक: भूजल-१८२१/ प्र.क्र.९४/ पापु-१५ दिनांक २६ जूलै, २०२१.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यामध्ये भूजल उपशाचे प्रमाण अधिक आहे. भूजल उपशामध्ये सिंचनाकरिता प्रामुख्याने नगदी पिकांच्या सिंचनाकरिता भूजलाचा उपसा अधिक आहे. परिणामी राज्यातील काही भागात भूजल पातळीमध्ये दिवसेंदिवस घट होत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे अशा क्षेत्रातील पाणलोट क्षेत्रे अतिशोषित, शोषित, अंशत:शोषित या वर्गवारीमध्ये समाविष्ट आहेत. पुनर्भरणापेक्षा अधिक भूजल उपसा विंधन विहिरीद्वारे केल्याने भूजलाच्या उपलब्धतेवर आणि गुणवत्तेवर होत आहे.

भूजलाच्या अनियंत्रित उपशामुळे भूजल पातळीत होत असलेली घसरण व बाधित होत असलेली गुणवत्ता थांबविण्याकरिता मागणी व पुरवठा व्यवस्थापन प्रणालीच्या प्रभावी अंमलबजावणीद्वारे सहभागीय भूजल व्यवस्थापन, अधिकाधीक सशक्त करण्यासाठी संदर्भातील शासन निर्णयान्वये केंद्र शासन व जागतिक बँक अर्थ सहाय्यीत अटल भूजल योजना राज्यातील १३ जिल्ह्यातील १४४२ गावांमध्ये राबविण्यात येत आहे.

लोकसहभागातून भूजल व्यवस्थापन करणे असा अटल भूजल योजनेचा गाभा असुन त्याकरिता ग्राम स्तरावर जलअंदाजपत्रक तयार करणे, भूजल उपलब्धतेतील तूट भरुन काढण्याकरिता अस्तित्वातील राज्य व केंद्र पुरस्कृत योजनांचे अधिकाधिक अभिसरण

करणे व ग्रामस्तरावरील भूजल उपलब्धतेत शाश्वतता साध्य करणे असे योजनेचे उद्दीष्ट आहे.

अटल भूजल योजनेच्या अंमलबजावणीमध्ये समाविष्ठ गावांतील अधिकाधिक जनसमुदायाने सहभागी व्हावे व सर्वांनी गावातील भूजल व्यवस्था शाश्वत राखण्याकरिता हिरीरीने सहभाग नोंदवावा, या करिता गावा-गावांमध्ये सुदृढ स्पर्धा निर्माण होण्याच्या दृष्टीने व अटल भूजल योजनेचे मुख्य ब्रीद "लोकसहभागातून भूजल व्यवस्थापन" साध्य होण्याच्या दृष्टीने अटल भूजल योजनेंतर्गत - भूजल समृध्द ग्राम या नावाने स्पर्धा सुरु करुन जिल्हास्तरावर व राज्यस्तरावर उत्कृष्ट काम करणाऱ्या गावांना प्रोत्साहन (बक्षीस) निधी देऊन व अधिकारी, कर्मचारी आणि अटल भूजल योजनेमध्ये नेमलेल्या जिल्हा भागीदार संस्था (डीआयपी) यांना प्रशस्तीपत्र व सन्मान चिन्ह देऊन सन्मानित करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. याअनुषंगाने भूजल व्यवस्थापनातून ग्राम समृध्दी याचा विचार करुन भूजल समृध्द ग्राम स्पर्धा आयोजित करण्यासाठी शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

अटल भूजल योजनेंतर्गत राज्यामध्ये समाविष्ट गावांमध्ये योजनेच्या अंमलबजावणीमध्ये अधिकाधिक लोकसहभागाद्वारे भूजलाचे सनियंत्रण करणे, जलसुरक्षा आराखडा तयार करणे व त्यामध्ये समाविष्ट कामांची अंमलबजावणी करणे, राज्य व केंद्र पुरस्कृत योजनांचे अभिसरण होणे याकरिता सुदृढ स्पर्धात्मक वातावरण निर्मितीकरिता भूजल समृध्द ग्राम स्पर्धा सुरु करण्यास व जिल्हास्तरावर आणि राज्यस्तरावर उत्कृष्ट काम करणाऱ्या गावांना प्रोत्साहन (बक्षीस) निधी देऊन व अधिकारी, कर्मचारी आणि अटल भूजल योजनेमध्ये नेमलेल्या जिल्हा भागीदार संस्था (डीआयपी) यांना प्रशस्तीपत्र व सन्मान चिन्ह देऊन सन्मानित करण्यास शासन मान्यता देत आहे.

**१) अभियान स्पर्धा कार्यक्षेत्र व कालावधी-**

भूजल समृध्द ग्राम स्पर्धा केवळ अटल भूजल योजनेमध्ये समाविष्ट गावांकरिताच लागू राहील. भूजल समृध्द ग्राम स्पर्धा ही सन २०२२-२३ व २०२३-२४ या दोन आर्थिक वर्षाकरिता राबविण्यात येईल व दरवर्षी राज्य व जिल्हा स्तरावर प्रथम, द्वितीय, व तृतीय येणाऱ्या पात्र गावांना व अधिकारी, कर्मचारी आणि अटल भूजल योजनेमध्ये नेमलेल्या जिल्हा भागीदार संस्था (डीआयपी) यांना या स्पर्धेच्या अनुषंगाने देय असलेले पुरस्कार अथवा प्रशस्तीपत्र व सन्मान चिन्ह देण्यात येतील.

स्पर्धेचे वेळापत्रक खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | वर्ष | मुल्यमापनाचा कालावधी | समित्यांद्वारे तपासणी कालावधी | पुरस्कार जाहिर होण्याचा कालावधी |
|---|---|---|---|---|
| १. | २०२२-२३ | आतापासून ते ३१ मे, २०२३ | जून, २०२३ | जुलै, २०२३ |
| २. | २०२३-२४ | ०२ ऑक्टोबर, २०२३ ते ३१ मे, २०२४ | जून, २०२४ | जुलै, २०२४ |

**२) निधी उपलब्धता व विनियोग:-**

भूजल समृध्द ग्राम स्पर्धेतर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय बक्षिसांकरिता आणि आवश्यक प्रचार, प्रसिध्दी व कार्यक्रमांसाठी आवश्यक असणारा निधी, अटल भूजल योजनेंतर्गत राज्यास प्राप्त होणाऱ्या प्रोत्साहन निधीमधून अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर बक्षीसाची रक्कम प्रकल्प संचालक, अटल भूजल योजना, महाराष्ट्र तथा आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे मार्फत संबंधित ग्रामपंचायतींना बँक खात्यात वितरीत करण्यात येईल.

भूजल समृध्द ग्राम स्पर्धेमधून प्राप्त झालेला निधी संबंधित ग्रामपंचायतींना ग्रामसभेच्या मान्यतेने जल सुरक्षा आराखड्यामध्ये मंजूर असलेल्याच अशा कामावर ज्या करिता इतर योजनांमधून निधी मिळालेला नाही किंवा मिळत नाही किंवा मिळालेला निधी पुरेसा नाही अशा जलसंधारण, भूजल पुनर्भरण किंवा पाणी बचतीच्या कोणत्याही कामांवर खर्च करता येईल. जल सुरक्षा आराखड्यामध्ये मंजूर नसलेल्या कोणत्याही कामावर पुरस्काराचा निधी खर्च करता येणार नाही.

**३) स्पर्धेकरिता पात्रता व मुल्यांकन पद्धती :-**

अ) अटल भूजल योजनेमध्ये समाविष्ठ असलेली सर्व गावांना या स्पर्धेमध्ये भाग घेता येईल. स्पर्धेमध्ये भाग घेणाऱ्या गावांनी, त्यांचेकडील पाणी पूरवठा व स्वच्छता समितीमार्फत ठराव करुन ठरावाचे प्रतीसह जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांचेकडे चालू वर्षी एक महिन्यात /पुढील वर्षी दिनांक १५ सप्टेंबर, २०२३ पर्यंत अर्ज करावा.

ब) स्पर्धेमध्ये सहभागी होऊ इच्छिणाऱ्या गावांची तालुकानिहाय यादी वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी अर्ज स्विकृती दिनांकानंतर १५ दिवसांत अंतिम करावी. सदरील गावांची यादी उपविभागीय स्तरीय समितीकडे सादर करावी.

क) परिशिष्ट-०१ मध्ये दिलेल्या गुणांकनाप्रमाणे प्रत्येक भाग घेतलेल्या गावाचे मुल्यांकन उपविभाग स्तरीय समितीद्वारे दरवर्षी माहे मे अखेर पर्यंत करण्यात आलेल्या कामांच्या प्रगतीच्या आधारे करण्यात येईल. यानुसार पहिल्या वर्षीचे

मुल्यांकन माहे जून २०२३ मध्ये करण्यात येईल व दुसऱ्या वर्षीचे मुल्यांकन माहे जून २०२४ मध्ये करण्यात येईल व तालुकानिहाय गुणानुक्रमे पहिल्या ५ गावांची यादी जिल्हास्तरीय समिती अध्यक्षाकडे गोपनीय पत्राद्वारे सादर करतील. मुल्यांकनाची सर्व प्रक्रिया जून महिन्यातच पुर्ण करण्यात येईल.

ड) उपविभागस्तरीय समितीकडून यादीनुसार प्राप्त झालेल्या जिल्हास्तरावरील समितीद्वारे क्षेत्रीय स्तरावर फेर मुल्यांकन करुन प्रथम, द्वितीय व तृतीय या प्रमाणे क्रमवारी तयार करण्यात येईल. सदर यादी अंतिम करुन जुलै महिन्याच्या पहिल्या आठवड्यात गोपनिय पत्राद्वारे जिल्हास्तरीय समिती अध्यक्षाद्वारे प्रकल्प संचालक तथा आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे कडे पाठविण्यात येईल. अशा प्रकारे १३ जिल्ह्यांच्या याद्या प्राप्त झाल्यानंतर यांचा एकत्रित अहवाल राज्यस्तरीय समिती समोर सादर करण्यात येईल.

इ) अटल भूजल योजनेमध्ये समाविष्ठ १३ जिल्ह्यांमध्ये प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांक प्राप्त केलेल्या गावांचे राज्यस्तरीय समितीद्वारे मुल्यांकन करण्यात येईल व त्यामधून राज्यस्तरीय प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांक निश्चित करण्यात येईल.

ई) भूजल समृध्द ग्राम स्पर्धेची राज्य व जिल्हास्तरावरील क्रमांक माहे जुलै अखेर राज्यस्तरावरुन आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्याद्वारे जाहीर करण्यात येईल.

**४) पुरस्काराचे स्वरुप-**

**अ) गावांकरिता:-**

जिल्हास्तर व राज्य स्तरावर देण्यात येणाऱ्या प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांक पटकविणाऱ्या गावांना खालील प्रमाणे पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

| अ. क्र. | क्रमांक | जिल्हा स्तर | राज्य स्तर |
|---|---|---|---|
| | | बक्षिसाची रक्कम (रूपये) | |
| १ | प्रथम | ५० लाख | १ कोटी |
| २ | द्वितीय | ३० लाख | ५० लाख |
| ३ | तृतीय | २० लाख | ३० लाख |

**ब) अधिकारी, कर्मचारी आणि जिल्हा भागीदार संस्था (डिआयपी) करिता:-**

अधिकारी, कर्मचारी आणि जिल्हा भागीदार संस्था यांची पुरस्कारासाठी निवड करण्यासाठी आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी नामांकने राज्यस्तरीय निवड समितीस सादर करावीत. या नामांकनांमधून पुरस्कारासाठी राज्यस्तरीय निवड समिती अंतिम निर्णय घेईल.

**५) निवड समित्या -**

भूजल समृद्ध ग्राम स्पर्धेमध्ये परिशिष्ठ - ०१ मध्ये दिलेल्या निकषानुसार गावांचे मुल्यांकन यापूर्वी गठीत खालील समित्या कार्य करतील.

**अ) उपविभाग / तालुका स्तरीय समिती:**

**संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २६ जूलै, २०२१ नुसार गठीत तालुकास्तरीय समन्वय समिती संबंधित तालुक्यातील स्पर्धेत समाविष्ट गावांचे मुल्यांकन करील.**

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | उपविभागीय अधिकारी (महसुल) | अध्यक्ष |
| २ | गटविकास अधिकारी | सदस्य |
| ३ | तहसिलदार | सदस्य |
| ४ | तालुका कृषी अधिकारी | सदस्य |
| ५ | उपअभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा) जिल्हा परिषद | सदस्य |
| ६ | उपअभियंता, मृद व जलसंधारण | सदस्य |
| ७ | उपअभियंता, लघुसिंचन (जलसंपदा) | सदस्य |
| ८ | उपअभियंता, (सिंचन) जिल्हा परिषद | सदस्य |
| ९ | कृषी अधिकारी (पंचायत समिती) | सदस्य |
| १० | सहाय्यक / कनिष्ठ भूवैज्ञानिक | सदस्य सचिव |

समितीने, स्पर्धेमध्ये भाग घेतलेल्या गावांचे, तालुकानिहाय सोबत जोडलेल्या परिशिष्ट - १ मध्ये दिलेल्या निकषानुसार गावांचे मुल्यांकन करावे व गुणानुक्रमे प्रथम ५ गावांची यादी जिल्हास्तरीय समितीकडे गोपनीय स्वरुपात सादर करावी. जिल्हास्तरीय समितीने, उपविभागीय समितीद्वारे प्राप्त तालुकानिहाय ५ गावांची यादीमधून परिशिष्ट - १ मधील निकषानुसार फेर तपासणी करुन जिल्हास्तरीय प्रथम / द्वितीय व तृतीय क्रमांकाची गावाची निवड करुन, राज्यस्तरीय समितीकडे गोपनीय स्वरुपात सादर करावी.

**ब) जिल्हा स्तर समिती-**

संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २६ नोव्हेंबर, २०२० नुसार गठीत जिल्हा स्तरीय नियोजन व समन्वय समिती **संबंधित जिल्हयातील उपविभाग / तालुकास्तरीय समितीने निवड केलेल्या गावांचे मुल्यांकन करील.**

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सह-अध्यक्ष |
| ३ | उप-जिल्हाधिकारी, रोहयो | सदस्य |
| ४ | उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पंचायत | सदस्य |
| ५ | उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता | सदस्य |
| ६ | जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी | सदस्य |
| ७ | कार्यकारी अभियंता, जलसंपदा | सदस्य |
| ८ | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण, स्थानिक स्तर | सदस्य |
| ९ | जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (ल.पा.) | सदस्य |
| १० | कार्यकारी अभियंता, वीज वितरण | सदस्य |
| ११ | कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा, जिल्हा परिषद | सदस्य |
| १२ | जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | सदस्य सचिव |
| १३ | निमंत्रित सदस्य-२ आवश्यकतेनुसार | अध्यक्षांच्या परवानगीने |

**क) राज्यस्तरीय समिती**

संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २६ नोव्हेंबर, २०२० नुसार गठीत राज्य स्तरीय तांत्रिक सल्लागार समिती **जिल्हास्तरीय समितीने निवड केलेल्या गावांचे व आयुक्त, भूसवियं, यांनी नामनिर्देशन केलेल्या अधिकारी, कर्मचारी आणि जिल्हा भागीदार संस्था यांच्या कामाचे मुल्यांकन करून स्पर्धेचे निकाल अंतिम करील.**

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | **अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई** | अध्यक्ष |
| २ | **आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे तथा प्रकल्प संचालक, अटल भूजल योजना** | सदस्य |
| ३ | **आयुक्त, कृषी** | सदस्य |
| ४ | **प्रादेशिक संचालक, केंद्रीय भूमीजल मंडळ, नागपूर** | सदस्य |
| ५ | **संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपाययोजन केंद्र, नागपूर** | सदस्य |
| ६ | **आयुक्त, मृद व जलसंधारण** | सदस्य |
| ७ | **संचालक, मृद व संधारण व पाणलोटक्षेत्र व्यवस्थापन** | सदस्य |
| ८ | **सहसचिव/ उपसचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई** | सदस्य |
| ९ | **सह सचिव व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई** | सदस्य |
| १० | **अतिरिक्त / सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे तथा राज्य समन्वयक, अटल भूजल योजना** | सदस्य सचिव |
| ११ | निमंत्रित सदस्य-२ आवश्यकतेनुसार | अध्यक्षांच्या परवानगीने |

**६) अंमलबजावणी व समन्वय यंत्रणा-**

अटल भूजल योजनेच्या अंमलबजावणी करिता भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा ही प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा असल्याने भूजल समृध्द ग्राम स्पर्धेची संपुर्ण अंमलबजावणी व कार्यवाही भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमार्फत पार पाडली जाईल.

**७) सहभागी गावांना प्रशिक्षण आणि मार्गदर्शन -**

भूजल समृध्द ग्राम स्पर्धेमध्ये सकारात्मक भावनेने सक्रिय सहभाग घेण्यासाठी गावांना प्रेरीत करणे तसेच त्यांना प्रशिक्षण आणि मार्गदर्शन करणे ही कामे अटल भूजल योजनेमधून केली जाईल व याकरिता या योजनेमध्ये नेमलेल्या जिल्हा भागीदार संस्था, संघटनाचे व मार्गदर्शनाचे कार्य करतील.

**८) प्रसिध्दी –**

भूजल समृध्द ग्राम स्पर्धेची व्यापक प्रसिद्धी अटल भूजल योजनेच्या आय.ई.सी. कार्यक्रमातून केली जाईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०९१५०२२७६९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D90328C2FC4E73B881BCFEA3BC5824FA462A2EC1E4EAD4BFE3B4979112BDB493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2023.03.09 16:45:38 +05'30'

(रा. म. गेंगजे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई .
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई .
४. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई .
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१४. आयुक्त, (कृषी) कृषी आयुक्तालय, पुणे
१५. संचालक, मृद संधारण व पाणलोटक्षेत्र व्यवस्थापन, जलसंधारण आयुक्तालय, औरंगाबाद
१६. जिल्हाधिकारी, सर्व (मुंबई शहर व उपनगर वगळून)
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा सर्व
१८. संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर
१९. प्रादेशिक संचालक, केंद्रीय भूमीजल मंडळ, नागपूर

२०. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
२१. जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी (संबंधित सर्व)
२२. कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग ( संबंधित सर्व)
२३. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या.
२४. उपविभागीय महसूल अधिकारी, तहसिलदार, गट विकास अधिकारी, तालुका कृषी अधिकारी (संबंधीत सर्व)
२५. जिल्हा जलसंधारण अधिकारी
२६. उपअभियंता (लघुसिंचन) / उपअभियंता (सिंचन) जलसंपदा विभाग / जिल्हा परिषद
२७. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
२८. उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९. उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई.
३०. सन्माननीय विधानमंडळ सदस्य (सर्व)
३१. ग्रंथपाल, विधानमंडळ ग्रंथालय, मुंबई
३२. संबधित अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (संचालनालयामार्फत).
३३. निवडनस्ती, कार्यासन पापु-१५.

**शासन निर्णय क्रमांक:-भूजल-१८२२/प्र.क्र.२४५/पापु-१५ सोबतचे सहपत्र**
**परिशिष्ट - ०१**
**भूजल समृध्द ग्राम स्पर्धेमध्ये गावाच्या मुल्यांकनाचे निकष**

| अ क्र | प्रमुख टप्पे | उप टप्पे | एकुण गुण | प्राप्त गुण |
|---|---|---|---|---|
| ०१. | प्राथमिक तयारी - लोकसहभाग व जनजागृती करणे आणि गावशिवारातील भूजलाबाबतची माहिती संकलित करणे. - ५० गुण | **१.१** ग्रामस्तरावरील सर्व सामाजिक प्रतिनीधींचा गट / समिती स्थापन करुन त्यांची सभा घेणे - अभियानाचा उद्देश स्पष्ट करणे.<br>- उदा. ग्राम पंचायत व त्यांच्या उपसमिती<br>- ग्रा.पा.पु व स्व समिती व ईतर<br>- ग्राम स्तरावरील अधिकारी व कर्मचारी<br>- ग्राम रोजगार सेवक<br>- अंगणवाडी सेविका<br>- स्वयंसेवक<br>- भजनीमंडळ<br>- इत्यादी | १० | |
| | | **१.२** प्रभात फेरी, दवंडी, शालेय विद्यार्थी सहभाग - (निबंध, वत्कृत्व व चित्र रंगविणे स्पर्धा इ.) माध्यमातून जनजागृती -<br>कमीत कमी २ कार्यक्रम - ०५ गुण<br>२ कार्यक्रमांपक्षा जास्त - १० गुण | १० | |
| | | **१.३** महिला सहभाग -<br>एकुण संख्येच्या ५०% पेक्षा जास्त - ०५ गुण<br>५०% पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **१.४** वंचित घटकांचा सहभाग -<br>होय - ०५ गुण, नाही - ०० गुण | ०५ | |
| | | **१.५** PRA मध्ये लोकसहभागासह -<br>होय - ०५ गुण, नाही - ०० गुण | ०५ | |
| | | **१.६** शिवार फेरी मध्ये यंत्रणांसह लोकसहभाग -<br>होय - ०५ गुण, नाही - ०० गुण | ०५ | |
| | | **१.७** लोकसहभागातून पाणी व शेती विषयक माहिती संकलन -<br>पूर्ण - ०५ गुण, अपूर्ण - ०२ गुण | ०५ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | १.८ गावातील १००% विहीर / बोअरवेल नोंदी घेणे. - १००% विहीरी - ०५ गुण, ५०% विहीरी - ०२ गुण | ०५ | |
| ०२. | लोकसहभागातून ताळेबंद, जलसुरक्षा आराखडा व पिक नियोजन तयार करणे<br>५० गुण | २.१ भूजल व्यवस्थापन गट / समितीने भूजल उपलब्धतेचा ताळेबंद तयार करणे. | ०५ | |
| | | २.२ ताळेबंद मांडून जलसुरक्षा आराखडा तयार करणे व त्यास पाणी पूरवठा समितीची मान्यता घेणे . | ०५ | |
| | | २.३ जलसुरक्षा आराखड्यामध्ये जलसंधारणाच्या, भूजल पुनर्भरणाच्या आणि पाणी बचतीच्या उपाययोजनांचा समावेश करणे.<br>सर्वेक्षणासह - १० गुण<br>सर्वेक्षणाशिवाय - ०५ गुण | १० | |
| | | २.४ पाण्याच्या ताळेबंदानूसार रब्बी, उन्हाळी व बारमाही पिकांचे नियोजन करणे.<br>एकूण पिकाखालील सर्व क्षेत्राचे नियोजन-०५ गुण<br>एकूण पिकाखालील ५०% क्षेत्राचे नियोजन- ०२ गुण | ०५ | |
| | | २.५ जलसुरक्षा आराखड्यात गावामध्ये सद्यस्थितीत सुरु असलेल्या केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या योजनांच्या निधींचे जास्तीतजास्त अभिसरण (convergence) करणे.<br>- कोटी पेक्षा जास्त १.५० अभिसरण रक्कम रुपये गुण १०<br>०५ -कोटी पेक्षा कमी १.५० अभिसरण रक्कम रुपये गुण | १० | |
| | | २.६ जल सुरक्षा आराखड्यास ग्रामसभेची मान्यता घेणे - ०५ गुण<br>जल सुरक्षा आराखडा वाचून दाखविणे - ०२ गुण | ०५ | |
| | | २.७ श्रमदान, CSR किंवा अन्य माध्यमातून लोकसहभागाचे नियोजन करणे.<br>रक्कम रुपये ५० लाख पेक्षा जास्त - १० गुण<br>रक्कम रुपये ५० लाख पेक्षा कमी - ०५ गुण | १० | |
| ०३. | जलसुरक्षा आराखड्यामध्ये | जलसंधारण व भूजल पुनर्भरणाच्या योजना - अभिसरण - प्रती योजना ०५ गुण | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | समाविष्ठ योजना अभिसरणाचे माध्यमातुन राबविणे -१०० गुण | **३.१** मनरेगा | ०५ | |
| | | **३.२** पं.कृ.सिं.यो. | ०५ | |
| | | **३.३** १५ वित्त आयोग | ०५ | |
| | | **३.४** मुख्यमंत्री जलसंवर्धन योजना | ०५ | |
| | | **३.५** जल जीवन मिशन | ०५ | |
| | | **३.६** स्वच्छ भारत मिशन | ०५ | |
| | | **३.७** कॅच द रेन | ०५ | |
| | | **३.८** जिल्हा नियोजन समिती (DPDC) | ०५ | |
| | | **३.९** अमृत सरोवर | ०५ | |
| | | **३.१०** एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) | ०५ | |
| | | अभिसरणांतर्गत विविध योजनेतून समाविष्ट करावयाची कामे | | |
| | | **३.११** विहिर पुनर्भरण - एकूण ५० पेक्षा जास्त - ०५ गुण व त्यापेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **३.१२** बोअर पुनर्भरण<br>एकूण २० पेक्षा जास्त - ०५ गुण<br>एकूण २० पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **३.१३** इमारतीच्या छतावरील पाणी साठविणे<br>सार्वजनीक इमारत २ व खाजगी इमारत ३ करीता - ०५ गुण<br>सार्वजनीक इमारत २ व खाजगी इमारत ३ पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **३.१४** सांडपाणी पुर्नवापर<br>१००० लोकसंख्येपक्षा जास्त - ०५<br>१००० लोकसंख्येपक्षा कमी - ०२ | ०५ | |
| | | **३.१५** दुरुस्ती शेततळे / खोदतळे<br>एकूण १० पेक्षा जास्त - ०५<br>एकूण १० पेक्षा कमी - ०२ | ०५ | |
| | | **३.१६** शोष खड्डे<br>एकूण १०० पेक्षा जास्त - ०५<br>एकूण ५० पेक्षा कमी - ०२ | ०५ | |
| | | **३.१७** नाला / तलाव / बंधारे मधील गाळ काढणे<br>एकूण कामे १० पेक्षा जास्त - ०५ गुण<br>एकूण कामे ०५ पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | **३.१८** वृक्ष लागवड<br>५०००० वृक्ष लागवड - ०५ गुण<br>१०००० ते ५०००० वृक्ष लागवड - ०२ | ०५ | |
| | | **३.१९** समतल सलग स्तर इ.<br>१० हेक्टर पेक्षा जास्त - ०५ गुण<br>१० हेक्टर पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **३.२०** बांध दुरुस्ती<br>एकूण कामे ०५ पेक्षा जास्त - ०५ गुण<br>एकूण कामे ०५ पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| **०४.** | पाणी बचतीच्या उपाययोजना राबविणे<br>१०० गुण | पाण्याची मागणी कमी करून व्यवस्थापन करणे (सूक्ष्म सिंचन - ठिबक सिंचन, रेन पाईप, आच्छादन, अबसारबर, मुरघास, हायड्रोफ़ोनिक्स चारा, डिफ़्यूजर, मुलस्थानी जलसंधारण, सेंद्रिय खतांचा वापर) | | |
| | | **४.१-** सुक्ष्मसिंचन (ठिबक / तुषार)<br>१०० हेक्टर किंवा एकूण पिक क्षेत्राच्या ५०% क्षेत्र असेल - १० गुण<br>१०० हेक्टर किंवा एकूण पिक क्षेत्राच्या ५०% क्षेत्रापेक्षा कमी - ०५ गुण | १० | |
| | | **४.२-** पिक फेरबदल -<br>कोरडवाहू फळबाग लागवड किंवा कमी पाणी लागणारी पिके एकूण क्षेत्राच्या ५०% असेल - १० गुण<br>कोरडवाहू फळबाग लागवड किंवा कमी पाणी लागणारी पिके एकूण क्षेत्राच्या ५०% पेक्षा कमी - ०५ गुण | १० | |
| | | **४.३-** नैसर्गिक साहित्यापासून मल्चिंग / प्लास्टिक मल्चिंग - ५० हेक्टर असेल - १० गुण<br>- ५० हेक्टर पेक्ष कमी - ०५ गुण | १० | |
| | | **४.४-** मुरघास<br>एकूण २० संच पेक्षा जास्त - १० गुण<br>एकूण १० ते २० संच पेक्षा कमी - ०५ गुण | १० | |
| | | **४.५-** उतारास आडवी पेरणी करणे.<br>५० हेक्टर पेक्षा जास्त - ०५ गुण<br>१० ते ५० हेक्टर पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | **४.६-** BBF चा वापर<br>५० हेक्टर पेक्षा जास्त - ०५ गुण<br>१० ते ५० हेक्टर पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **४.७-** बंदिस्त पाईपलाईन द्वारे सिंचन<br>५० हेक्टर पेक्षा जास्त - ०५ गुण<br>१० ते ५० हेक्टर पेक्षा कमी - ०२ गुण | १० | |
| | | **४.८**- नियंत्रीत शेती (ग्रीन हाऊस / शेडनेट)<br>५ हेक्टर पेक्षा जास्त - ०५ गुण<br>५ हेक्टर पेक्षा कमी - ०२ गुण | १० | |
| | | **४.९**- परसबाग<br>२० पेक्षा जास्त - ०५ गुण<br>२० पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **४.१०-** सेंद्रीय कर्ब वाढविणे (उदा. पाचट कुजविणे, इ.)<br>१० हेक्टर पेक्षा जास्त - ०५ गुण<br>१० हेक्टर पेक्षा कमी - ०२ गुण | ०५ | |
| | | **४.११-** राबविण्यात आलेल्या पाणी बचतीच्या इतर उपाययोजना (पिण्यासाठी, पशुधनासाठी, उद्योगधंद्यांसाठी पाण्याचा वापर काटकसरीने व कार्यक्षमपणे करणे.) | ०५ | |
| | | **४.१२**- जनावरासाठी पिण्याचे पाणी स्वतंत्र सोय | ०५ | |
| | | **४.१३**- घरगूती पाणी वापर बचत | १० | |
| ०५. | नाविण्यपूर्ण उपक्रम - ५० गुण | **५.१**- स्त्रोत बळकटीकरण, भूजल पुनर्भरण, जलसंधारण | १० | |
| | | **५.२-** पाणी बचतीच्या व वैयक्तिक पाणी वापरामध्ये नाविण्यपूर्ण उपक्रम राबविणे. | १० | |
| | | **५.३-** गट शेती - १० गट / शेतकरी उत्पादक कंपनी - ०२ कंपनी - १० गुण व त्यापेक्षा कमी - ०५ गुण | १० | |
| | | **५.४**- सेंद्रीय शेती / कंपोस्ट खते १० हेक्टर - १० गुण व त्यापेक्षा कमी - ०५ गुण | १० | |
| | | **५.५-**खोल विंधन विहिरींमधून सिंचन बंदी | १० | |
| ०६. | पाऊस पाणी मोजमाप व भूजलपातळी विषयक निरीक्षणे | **६.१-** पर्जन्यमापकाच्या नोंदी मोबाईल अँप द्वारे घेणे व निगा राखणे. | ०५ | |
| | | **६.२-** पाणलोट क्षेत्र निहाय पर्जन्यमापक उभारणी व नोंदणी | ०५ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | ५० गुण | **६.३-** प्रती गाव १० निरीक्षण विहीरीमधून भूजल पातळीच्या दर आठवड्यात नोंदी मोबाईल ॲप द्वारे घेणे. | ०५ | |
| | | **६.४-** पिझोमीटरच्या नोंदी घेणे व निगा राखणे. | ०५ | |
| | | **६.५-** वॉटर फ्लो मीटरच्या नोंदी घेणे व निगा राखणे. | ०५ | |
| | | **६.६-** ०५ विहिरी मधून पाणी गुणवत्ता तपासणे व राखणे. | ०५ | |
| | | **६.७-** भूजल माहिती केंद्र तयार करणे. | ०५ | |
| | | **६.८-** जलालेख तयार करणे व भूजल माहिती केंद्रामध्ये लावणे. | ०५ | |
| | | **६.९-** खोल विंधन विहीरी खोदण्यास बंदी | १० | |
| **०७.** | फलनिष्पत्ती १००गुण | **७.१-** जलसुरक्षा आराखड्याची अंमलबजावणी - अभिसरण व प्रोत्साहन ५०% - ५ गुण, ७५% - १० गुण , १००% - २० गुण | २० | |
| | | **७.२-** सूक्ष्म सिंचन क्षेत्रामध्ये वाढ - ५० हेक्टर पेक्षा जास्त - २० गुण व त्यापेक्ष कमी - १० गुण | २० | |
| | | **७.३-** पिक बदल - कमी पाण्याच्या पिकाचा अवलंब - ५० हेक्टर पेक्षा जास्त - २० गुण व त्यापेक्षा कमी १० गुण | २० | |
| | | **७.४-** भूजल पातळी घसरण दरामध्ये स्थिरता किंवा वाढ - २ मिटर पेक्षा जास्त - १० गुण व त्यापेक्षा कमी - ०५ गुण | १० | |
| | | **७.५-** जलसुरक्षा आराखड्यामध्ये नियमीत लोकसहभागातून सुधारणा - जल अंदाज पत्रकामध्ये सुधारणा | १० | |
| | | **७.६-** टॅकरमु क्त गाव / टंचाईमुक्त गाव | २० | |
| ८. | पारदर्शकता व जाहीर प्रगटन - ५० गुण | **८.१-** योजनेच्या MIS वर सर्व मोड्युल्सवर माहिती अद्ययावत ठेवणे. | ०५ | |
| | | **८.२-** पूर्ण झालेल्या कामांचे अक्षांश - रेखांश छायाचित्र वेबसाईटवर अपलोड करणे. | १० | |
| | | **८.३-** मंजूर व झालेल्या कामांची अद्ययावत माहिती वेबसाईटवर अपलोड करणे. | १० | |
| | | **८.४-** मंजुर कामे सुरु करताना व कामावर झालेल्या खर्चाची माहिती ग्रामसभेसमोर ठेवणे. | १० | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | **८.५-** कामाच्या गुणवत्तेबाबत प्राप्त तक्रारींचे निराकरण करणे. | ०५ | |
| | | **८.६-** अभियान काळात झालेल्या कामांचे समवर्ती व त्र्ययस्थ यंत्रणामार्फत मूल्यमापन करणे. | १० | |
| | | **एकुण** | **५५०** | |